**भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रू. १६८.०० लाख निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. फुंफला-२०२३/प्र.क्र. ३३/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०२३

संदर्भ:-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९-अे, दि. ६.७.२०१८
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दि. ०४.०४.२०२२
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२२/प्र.क्र. ८९/९-अे, दि. ०४.१०.२०२२
४) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. कृआ/फलो-२/भा.फुं.फ. योजना/२०२२-२३/९८९/२३, दिनांक २३ जानेवारी, २०२३ चे पत्र
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र. ०२/अर्थसंकल्प (विघयो), दि. १३.०२.२०२३

प्रस्तावना :-

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त **संदर्भ क्र. १** येथील शासन निर्णयान्वये राज्यात स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. वित्त विभागाच्या **संदर्भ क्र. २** येथील परिपत्रकास अनुलक्षून स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०२२-२३ मध्ये राबविण्यासाठी रु. १०४५०.०० लाख इतक्या निधीच्या कार्यक्रमास **संदर्भ क्र. ३** येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी **संदर्भ क्र. ४** येथील पत्रान्वये सन २०२२-२३ करिता निधी वितरीत करण्याबाबत विनंती केली आहे. त्यास अनुलक्षून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने अनुसूचित जाती प्रवर्गाचा रु. १६८.०० लाख एवढा निधी **संदर्भ क्र. ५** येथील शासन निर्णयान्वये कृषि विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्यास अनुलक्षून शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात स्व. भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेच्या अंमलबजावणीकरिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रू. १६८.०० लाख (रूपये एक कोटी अडुसष्ट लाख फक्त) निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात येत आहे.

२) सदर निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. एन-३

२४०१- पिक संवर्धन

(००)(७८९) अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना

(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना

(०१)(२५ ) भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना (कार्यक्रम) (२४०१ B३२१)

३३ अर्थसहाय्य

३) या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रु. १६८.०० लाख (रूपये एक कोटी अडुसष्ट लाख फक्त) रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४) सदर योजना राबविताना यापूर्वी निर्गमित शासन निर्णयातील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सदर उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदींतून फक्त अनुसूचित जाती व नवबौद्ध घटकातील लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

६) यापुढे निधी वितरणाचे प्रस्ताव सादर करण्यापूर्वी या योजनेमधील लाभार्थ्यांची माहिती MPSIMS वर अद्ययावत करण्याची दक्षता घ्यावी.

७) सदर वितरीत निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

८) उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

९) निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१०) सदर आदेश वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२२/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ मधील अटी व शर्तीचे अनुपालन करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

११) सदर आदेश सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२२/प्र.क्र. ०२/अर्थसंकल्प (विघयो), दि. १३.०२.२०२३ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२१६१३३१३५८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.02.16 13:35:24 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.-३२
६) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.-३२
७) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
८) आयुक्त (कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
९) आयुक्त (समाजकल्याण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१२) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१३) सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१५) संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
१६) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२०) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२१) कक्ष अधिकारी, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२२) कक्ष अधिकारी, व्यय-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
२३) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, सा. न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२४) निवड नस्ती/९-अे.